**कोल्हापूर जिल्हा नियोजन समितीवर विशेष निमंत्रित सदस्याची नियुक्ती करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: डिएपी-२०२१/प्र.क्र.५१/का.१४८१-अ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १८ मे, २०२२.

**पहा:-** १) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम, १९९८

२) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) (सुधारणा) अधिनियम, २०००

३) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती कोल्हापूर यांचे पत्र क्र.नियोजन-का-१८/जिनिस/१७४३/२०२०-२१, दि.०१/११/२०२१.

४) जिल्हा नियोजन अधिकारी, कोल्हापूर यांचे क्र.नियोजन-का-१८/जिनिस/७३५/२०२२-२३, दि.१२.५.२०२२ चे पत्र.

५) शासन निर्णय समक्रमांक दि.१२.५.२०२२.

**शासन निर्णय:-**

"महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) (सुधारणा) अधिनियम, क्रमांक ३०/२०००" मधील कलम ३ चा पोटकलम (३) (दोन) (ब) व ३(३)दोन (क) नुसार व ३ (३) मधील (चार) (फ) येथिल तरतूदीनुसार विधीमंडळ व संसद सदस्यांमधून नामनिर्देशनाच्या २ सदस्यांची, जिल्हा नियोजनाचे ज्ञान असलेले नामनिर्देशित सदस्य ४ सदस्यांची व जिल्हा नियोजनाचा अनुभव असलेले १४ व्यक्तींची विशेष निमंत्रित सदस्य म्हणून कोल्हापूर जिल्हा नियोजन समितीवर संदर्भीय क्र. ५ येथील शासन निर्णयान्वये नियुक्ती करण्यात आली होती. सदर १४ विशेष निमंत्रित सदस्यांपैकी मा. पालकमंत्री, कोल्हापूर यांनी शिफारस केल्यानुसार जिल्हा नियोजन समितीवरील खालील **"विशेष निमंत्रित सदस्याची"** नियुक्ती **रद्द** करण्यात येत असून त्यांचे जागी **नवीन विशेष निमंत्रित सदस्याची नियुक्ती** करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| नियुक्ती रद्द करण्यात येत असलेले विशेष निमंत्रित सदस्य | | | नवनियुक्त विशेष निमंत्रित सदस्य | |
|---|---|---|---|---|
| **अ.क्र** | **सदस्याचे नाव** | **पत्ता** | **सदस्याचे नाव** | **पत्ता** |
| १ | श्री.अनिल बाळू मादनाईक (सावकार) | मु.उदगाव, ता. शिरोळ, जि.कोल्हापूर | श्री.शैलेश उर्फ शिवरुद्र गजानन आडके | मु. जयसिंगपूर, ता. शिरोळ, जि. कोल्हापूर |

२. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, **कोल्हापूर** यांनी उपरोक्त आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.

३. **कोल्हापूर** जिल्हा नियोजन समितीवर वरील नमूद नामनिर्देशित तसेच विशेष निमंत्रित यांच्या करण्यात आलेल्या नियुक्त्या पुढील आदेश होईपर्यंत किंवा शासनाकडून सदर नियुक्त्या रद्द होईपर्यंत या पैकी जे अगोदर घडेल, तो पर्यंत अबाधित राहतील.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०५१८१६४०५७९११६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SANJEEV
HARISHCHANDRA
DHURI

Digitally signed by SANJEEV HARISHCHANDRA DHURI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b2040f8afae5b15468c26cd79b1393381092c74fb3501bf565f466dec2136a36, pseudonym=457F70F5FA4DEA10E909A007981CEAF0F1C5A45D, serialNumber=F955EDB9F98089D5B84355354FDE7CA14F577C3C2B384D076E4614388B1F5E7A, cn=SANJEEV HARISHCHANDRA DHURI
Date: 2022.05.18 16:43:55 +05'30'

**( सं. ह. धुरी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
४. मा. पालकमंत्री तथा अध्यक्ष, जिल्हा नियोजन समिती, कोल्हापूर यांचे खाजगी सचिव.
५. मा. कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, महाराष्ट्र, मंत्रालय, मुंबई
६. मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. विभागीय आयुक्त, पुणे विभाग पुणे
८. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, कोल्हापूर
९. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, पुणे विभाग पुणे
१०. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, कोल्हापूर
११. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
१२. कोषागार अधिकारी, कोल्हापूर
१३. निवड नस्ती, का-१४८१-अ, नियोजन विभाग.